**मौजा-सिताबर्डी, नागपूर येथील उद्योग विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर या मुद्रणालयास वापराकरीता देण्यात आलेल्या भूमापन क्र.१८५२ येथील १६१८२ चौ.मी. पैकी ९६७० चौ.मी. एवढी जागा महाराष्ट्र विधानमंडळास कार्यालयीन वापराकरीता उपलब्ध करण्याकरीता ना हरकत देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग,ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**

**शासन निर्णय क्र. मुलेसा-२०२३/प्र.क्र.२०२/उद्योग-४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १३ जून, २०२५.

**संदर्भ:-** उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय, क्र.मुलेसा-२०२३/ प्र.क्र.२०२/उद्योग-४, दिनांक २९.०३.२०२५.

<u>प्रस्तावना</u> :-

महसूल विभागामार्फत उद्योग विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर येथील ९६७० चौ.मी. इतकी जागा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, नागपूर यांना कार्यालयीन वापराकरीता उपलब्ध करून देण्याबाबत विनंती करण्यात आली होती. यासंदर्भात मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली दि.१६.१२.२०२४ रोजी पार पडलेल्या बैठकीत महाराष्ट्र विधानमंडळाच्या कामकाजात वाढ होणार असल्याने विधानमंडळाकरीता अतिरिक्त जागेची आवश्यकता असल्याचे नमुद केले आहे.

उद्योग विभागाच्या अधिनस्त शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर, मध्यवर्ती कारागृह मुद्रणालय, नागपूर व शासकीय लेखनसामग्री भांडार, नागपूर या तीनही कार्यालयाच्या इमारतींच्या पुनर्विकासाची बाब उद्योग विभागाच्या विचाराधीन आहे. त्यानुषंगाने मुद्रणालयाच्या जागेची प्रत्यक्ष पाहणी, जागेचा नकाशा, ७/१२ व मोकळी जागा तसेच प्रत्यक्ष बांधकाम क्षेत्रफळाबाबतची माहिती घेऊन प्रस्ताव सादर करण्यासाठी विभागीय आयुक्त, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली दि.११.०५.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती.

त्यानुषंगाने मौजा-सिताबर्डी, नागपूर येथील उद्योग विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर या मुद्रणालयाकडे असलेल्या भूमापन क्र.१८५२ येथील १६१८२ चौ.मी. पैकी ९६७० चौ.मी. एवढी जागा महाराष्ट्र विधानमंडळास कार्यालयीन वापराकरीता मंजूर करण्याच्या अनुषंगाने महसूल विभागास हस्तांतरीत करण्याकरीता उद्योग विभागाची ना-हरकत कळविण्याबाबतच्या दिनांक २९.०३.२०२५ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करून याबाबत सुधारित सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

१. मौजा-सिताबर्डी, नागपूर येथील उद्योग विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर या मुद्रणालयास उपलब्ध असलेली भूमापन क्र.१८५२ येथील १६१८२ चौ.मी. पैकी ९६७० चौ. मी. इतकी जागा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, नागपूर यांच्या कार्यालयीन वापराकरीता उपलब्ध करून देण्याकरिता सदर जमिन महसूल विभागास हस्तांतरीत करण्यास उद्योग विभागाची ना-हरकत देण्यात येत असून उद्योग विभागाचा यापुर्वी निर्गमित करण्यात आलेला दिनांक २९.०३.२०२५ रोजीचा शासन निर्णय (वाचा क्र.१) अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. उद्योग विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर येथील जागेवर पुर्नविकासाचा प्रस्ताव विचाराधिन असल्याने एकूण आवश्यक बांधिव क्षेत्राची मागणी संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांनी महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ (एमएसआयडीसी) यांच्याकडे नोंदवावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६१३१६४४३६७७१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LAXMIKANT
GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E714BBCD4D43C6782884C7E7A2091F9F1EDC1D97EBB542C48B98FB8C8BDD6CF4, cn=LAXMIKANT GOPALRAO DHOKE
Date: 2025.06.13 16:46:37 +05'30'

**( लक्ष्मीकांत ढोके )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (उद्योग), उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, नागपूर
५. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
९. विभागीय आयुक्त, नागपूर
१०. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर
११. संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई
१२. व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर
१३. निवडनस्ती (उद्योग-४)